**संकल्प सेवाभावी संस्था नांदेड या संस्थेस मान्यता रद्द करण्यात आलेली/बंद पडलेली "श्री संत रामबापू प्राथमिक आदिवासी आश्रमशाळा जांभळा, ता. हदगाव, जि. नांदेड" ही अनुदानित आश्रमशाळा हस्तांतरीत व स्थलांतरीत करुन मौजे अर्धापूर, जि. नांदेड येथे चालविण्यास देण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०२४/प्र.क्र.५/का-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १५ मार्च, २०२४

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अपिल-२०१५/प्र.क्र.१११/का.११, दि. ०९/०७/२०१५.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२०१९/प्र.क्र.१०२/का.११, दि.११/०६/२०१९.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२०२३/प्र.क्र.७१/का.११, दि. २३.०८.२०२३.
४) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र. अनुआशा २०२३/प्र.क्र.४३/का-७(४)/७०४७, दिनांक १९.१०.२०२३

## प्रस्तावना

आदिवासी विकास विभागातील मान्यता रद्द करण्यात आलेल्या/बंद करण्यात आलेल्या अनुदानित आश्रमशाळा अन्य संस्थेस चालविणेस देण्याबाबतची कार्यपध्दती दिनांक २३.०८.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

सचिव, संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड यांनी दिनांक ०४.०१.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट, जि. नांदेड यांचेकडे राज्यात बंद पडलेली अनुदानित आश्रमशाळा संस्थेस मौजे अर्धापूर, जि. नांदेड येथे चालविण्यासाठी मिळण्याबाबत प्रस्ताव सादर केला होता.

त्यानुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड या संस्थेस राज्यात बंद पडलेली अनुदानित आश्रमशाळा हस्तांतरीत व स्थलांतरीत करुन मौजे अर्धापूर, जि. नांदेड येथे सुरु करण्यास परवानगी मिळण्याबाबत प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट, जि. नांदेड यांनी अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांचेमार्फत सादर केलेल्या प्रस्तावाची दिनांक २३.०८.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अनुषंगाने मुद्येनिहाय छाननी करुन प्रस्ताव संदर्भाधीन क्र.४ येथील दिनांक १९.१०.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

मौजे अर्धापूर, जि. नांदेड परिसरात असलेली आदिवासी लोकसंख्या व तेथील प्रामुख्याने आदिवासी विद्यार्थ्यांची निवासी शिक्षणाची गरज विचारात घेऊन मौजे अर्धापूर, जि. नांदेड या ठिकाणी राज्यातील मान्यता रद्द करण्यात आलेली/बंद पडलेली आश्रमशाळा हंस्तातरित व स्थलांतरीत करून स्वयंसेवी संस्थेमार्फत चालविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासन निर्णय दिनांक ०९.०७.२०१५ रोजीच्या आदेशान्वये मान्यता रद्द करण्यात आलेली/बंद पडलेली "श्री संत रामबापू प्राथमिक आदिवासी आश्रमशाळा जांभळा, ता. हदगांव, जि. नांदेड" ही अनुदानित आश्रमशाळा हस्तांतरीत व स्थलांतरीत करुन संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड या संस्थेस सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षापासून संकल्प आदिवासी अनुदानित आश्रमशाळा या नावाने मौजे अर्धापूर, जि. नांदेड येथे चालविण्यास देण्यास पुढील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

(१) अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती यांनी ३० दिवसांचे आत हस्तांतर व स्थलांतर आदेश निर्गमित करावे. असे आदेश निर्गमित झाल्यानंतर संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड या संस्थेने उपरोक्त अनुदानित आश्रमशाळा शैक्षणिक वर्ष सन २०२४-२५ पासून सुरु करावी व शाळा सुरु केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक, अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट यांना त्याबाबत कळविण्यात यावे.

(२) मान्यता रद्द करण्यात आलेल्या आश्रमशाळेमध्ये कोणते वर्ग सुरु होते व किती पदास मान्यता होती. तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी किती होते याबाबतची माहिती प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट यांनी संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड, ता.जि.नांदेड या संस्थेस कळवावी.

(३) आश्रमशाळेतील आवश्यक पद भरतीसाठी अपर आयुक्त, अमरावती यांची मान्यता घेण्यात यावी. तसेच पदमान्यता देताना संदर्भ क्र. २ मधील नमूद शासन निर्णय दिनांक ११.०६.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे.

(४) संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड या स्वयंसेवी संस्थेने शिक्षक- शिक्षकेत्तर कर्मचा-यांची नियुक्ती करताना शासनाने विहित केलेल्या अटी-शर्ती व नियमांचे पालन करावे. विहित अर्हताप्राप्त कर्मचा-यांची नेमणुक न केल्यास संस्थेस देय असलेले अनुदान अनुज्ञेय असणार नाही. प्रकरणपरत्वे आश्रमशाळेची मान्यता रद्द करण्यात येईल. अप्रशिक्षित शिक्षक उमेदवारांची नियुक्ती केल्यास त्यांच्या वेतनाची जबाबदारी शासनाची राहणार नाही व त्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील याची संस्थेने नोंद घ्यावी.

(५) नवीन संस्थेला राज्यात बंद पडलेली अनुदानित आश्रमशाळा चालविण्यास मिळाल्यापासून २ वर्षात अनुदानित आश्रमशाळेसंदर्भात आश्रमशाळा संहिता-२०१९ मध्ये नमूद करण्यात आलेल्या मानकाप्रमाणे सर्व भौतिक सोयी-सुविधांसह आश्रमशाळेची व वसतिगृहाची स्वत:ची सुसज्ज पक्की इमारत बांधणे आवश्यक राहील. आश्रमशाळा चालविण्यास मिळाल्यापासून २

वर्षात संस्थेने याबाबत कार्यवाही न केल्यास सदर अनुदानित आश्रमशाळेची मान्यता कायमस्वरुपी रद्द करण्यात येईल.

(६) नवीन संस्थेने आश्रमशाळेत वर्गखोल्या व निवासाची स्वतंत्र इमारतीमध्ये व्यवस्था करावी. तसेच आश्रमशाळेच्या इमारतीमध्ये वसतिगृहामध्ये मानकाप्रमाणे स्नानगृहे, शौचालये आणि शुध्द पाण्याची मुबलक व्यवस्था तसेच आश्रमशाळा संहितेत नमूद सर्व भौतिक सोयी-सुविधा उपलब्ध करुन दयाव्यात.

(७) संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड या स्वयंसेवी संस्थेस शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या सुत्रानुसार अनुदान अनुज्ञेय राहील.

(८) संस्थेने अनुदानित आश्रमशाळासाठी 'आश्रमशाळा संहिता' तसेच शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी, शर्ती व नियमांचे पालन करावे.

(९) संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड या संस्थेने सदर आश्रमशाळा अन्य संस्थेस चालविण्यास देवू नये.

(१०) बालकांचा सक्तीचा व मोफत शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ अंतर्गत नमूद करण्यात आलेल्या सोयी-सुविधा विद्यार्थ्यांना उपलब्ध करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

(११) प्रत्येक वर्गात किमान ४० निवासी व १० बहिस्थ विद्यार्थी असावेत. सर्व निवासी विद्यार्थी हे अनुसूचित जमातीचे असतील.

(१२) शासनाने विहित केलेल्या अटी, शर्ती व नियमांचे पालन न केल्याचे निदर्शनास आल्यास तसेच उपरोक्त आश्रमशाळेबाबत गैरव्यवहार/गैर व्यवस्थापन याबाबत तक्रारी आल्यास संस्थेच्या आश्रमशाळेची मान्यता रद्द करण्यात येईल.

(१३) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांनी वरील संदर्भ क्र. ४ मधील नमूद शासन निर्णय दि. २३ ऑगस्ट, २०२३ मधील तरतुदीच्या अनुषंगाने संस्थेकडून आवश्यक त्या कागदपत्रांची पूर्तता करुन घ्यावी.

(१४) प्रस्तुत प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे न्यायप्रविष्ठ असलेल्या रिट याचिका क्र.६४४९/२०१५ सह रिट याचिका क्र. १०८६५/२०१५ मधील न्याय निर्णयाच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०४१५०२१४५७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN GORAKSHANATH SATHE

Digitally signed by PRAVIN GORAKSHANATH SATHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8aeae114bc10bc084ffcdf2ae0c667ca6c3eca844c7809bb00f184ed1dc997ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D0E975C83DBBE2A19FD387F2130D87449EAD27B920A608BF243707CB95AAAA3, cn=PRAVIN GORAKSHANATH SATHE
Date: 2024.07.19 17:23:59 +05'30'

**( प्रविण गो. साठे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव यांचे कार्यालय, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. लोकआयुक्त आणि उप लोकआयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र राज बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई-१८.
६. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती.
८. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
९. जिल्हाधिकारी, नांदेड.
१०. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, नांदेड.
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
१७. अध्यक्ष/ सचिव, संकल्प सेवाभावी संस्था, नांदेड.